**महाराष्ट्र राज्य लॉटरीचे सुवर्ण महोत्सवी वर्षाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः मरालॉ २०१९/प्र.क्र.०६/लॉटरी-२**

महाराष्ट्र राज्य लॉटरी, नवीन प्रशासन भवन,
मंत्रालयासमोर, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १० जानेवारी, २०१९.

**शासन परिपत्रक :**

महाराष्ट्र राज्य लॉटरीची सुरूवात दि.१२ एप्रिल,१९६९ रोजी करण्यात आली. महाराष्ट्र राज्य लॉटरीचे सन २०१९ हे सुवर्ण महोत्सवी वर्ष असल्याने त्यानुषंगाने घाऊक विक्रेते व संबंधित अधिकारी यांच्या सोबत चर्चा करण्यात आली. सदर चर्चे दरम्यान घाऊक विक्रेते व संबंधीत अधिकारी यांनी महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या दि.३१/१२/२०१९ पर्यंत काढण्यात येणाऱ्या सर्व पेपर लॉटरी सोडतींच्या नावासमोर तिकीटांवर **"सुवर्ण महोत्सवी वर्ष "** असे मराठी व इंग्रजी अक्षरात छापण्यात यावे, अशी सुचना केलेली आहे. त्यानुषंगाने महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या दि.३१/१२/२०१९ पर्यंत काढण्यात येणाऱ्या सर्व पेपर लॉटरी सोडतींच्या नावासमोर तिकीटांवर **" सुवर्ण महोत्सवी वर्ष "** असे मराठी व इंग्रजी अक्षरात छापण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. उपसंचालक (वित्त व लेखा) यांच्याकडून महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या पेपर लॉटरी सोडतींच्या तिकीटांचे संकल्पचित्र (डिझाईन) तयार करतांना वरील बाब विचारात घेऊन संकल्पचित्र (डिझाईन) तयार करण्यात येईल.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१११२३१३००१०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Madhav Kundalik Avhad

Digitally signed by Madhav Kundalik Avhad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=33f159af855e668523427acf7322c4c3427aed8bf6b0bf7eb4dfdd5490c3d843, cn=Madhav Kundalik Avhad
Date: 2019.01.11 12:50:54 +05'30'

**( माधव आव्हाड )**
कक्ष अधिकारी तथा
राज्य लॉटरी अधिकारी, वित्त विभाग.

**प्रति,**

१. मा. मंत्री (वित्त), मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
२. मा. राज्यमंत्री (वित्त), मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
३. अपर मुख्य सचिव, (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव, (ले. व को.), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अपर मुख्य सचिव, (गृह),गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. आयुक्त, राज्य लॉटरी, वित्त विभाग, मुंबई-३२.
७. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई-२१.
९. महालेखापाल, महाराष्ट्र ½ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
१०. महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मंत्रालय, मुंबई-३२.

११. सह सचिव (राज्य लॉटरी) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई-५१.
१३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१४. उप संचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य लॉटरी कार्यालय, वाशी, नवीमुंबई.
१५. कक्ष अधिकारी, प्रशा-४/लॉटरी-३/ अर्थोपाय/ लेखाधिकारी (लॉटरी संचालनालय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. निवड नस्ती, लॉटरी -२.